**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतनश्रेणी रु. १५६००-३९१०० ग्रेड पे रु.६६००) मधील जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील बदल्या**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०१८/प्र.क्र.३३६/सेवा-२**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, संकुल इमारत
१० वा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: १५ नोव्हेंबर, २०१८

वाचा : संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/कक्ष-१/टे-७/डॉ. जाधव जिआअ/ बदली प्रस्ताव/३२२३/२०१८, दि. २८.९.२०१८

**शासन आदेश :-**

डॉ. शितलकुमार जाधव, जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद सोलापूर यांच्याविरुध्द प्राप्त तक्रारीच्या अनुषंगाने त्यांची बदली करण्याबाबत व जिल्हा आरोग्य अधिकारी पदावर अन्य अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्याबाबत संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी संदर्भिय पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने खालील प्रमाणे बदली करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|
| १. | डॉ. शितलकुमार जाधव, जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद सोलापूर | सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग) सोलापूर या रिक्त पदावर (प्रशासकीय कारणास्तव ) |
| २. | डॉ. बी. टी. जमादार, सहायक संचालक, (राज्य कुटुंब कल्याण केंद्र) पुणे | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर (प्रशासकीय कारणास्तव) |

२. सदर आदेश महाराष्ट्र कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४) आणि ४(५) मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

४. संबंधित अधिकाऱ्यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे तसेच रुजू अहवाल संचालक, आरोग्य सेवा, मुंबई व शासनास सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११५१५०३४०५९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishnudas Pundlikrao Ghodke

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, serialNumber=9ab69d6945f8950a9525831f8ae9726be295d17576e78d19fa8f6cb952bb04a0, cn=Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2018.11.15 15:17:44 +05'30'

**(वि. पुं. घोडके)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अ. व प्र.) मुंबई
५. उपसंचालक, आरोग्य सेवा,पुणे मंडळ पुणे
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/सोलापूर
८. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद सोलापूर
९. सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग) सोलापूर
१०. सहायक संचालक, आरोग्य सेवाश् (राज्य कुटुंब कल्याण केंद्र) पुणे
११. डॉ. शितलकुमार जाधव, जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद सोलापूर
१२. डॉ. बी. टी. जमादार, सहायक संचालक, (राज्य कुटुंब कल्याण केंद्र) पुणे
१३. निवड नस्ती- सेवा-२